**सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता मागेल त्याला फळबाग /ठिबक/ तुषार सिंचन/ शेततळे/ शेततळयाचे अस्तरीकरण/ शेडनेट/ हरितगृह/ आधुनिक पेरणीयंत्र (BBF) /कॉटन श्रेडर देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्यव्यवसाय विभाग**

**शासन परिपत्रक क्र. मुशासिं ०३२३/प्र.क्र.४७/१४-अे**

दालन क्र. ५१७, मंत्रालय (विस्तार),

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई-३२.

दि. २५ एप्रिल, २०२३

**संदर्भ :**

१. कृषि विभाग शासन निर्णय क्र राकृवि ०३१७/प्र.क्र.१८/राकृवियो कक्ष, दि. १३.०४.२०१७
२. कृषि विभाग शासन निर्णय क्र. राफयो-२०१८/प्र.क्र.४७/९अे दि. ०६.०७.२०१८
३. कृषि विभाग शासन निर्णय क्र. कोशाशे-४२१८/प्र.क्र.८६/८अे दि. १९.०८.२०१९
४. कृषि विभाग शासन निर्णय क्र. राकृवि-२०२१/प्र.क्र.१४७/९अे दि. ०४.१०.२०२१
५. कृषि विभाग शासन निर्णय क्र. शाशेअ-२०२२/प्र.क्र.७५/१४अे दि. २९.०६.२०२२

**प्रस्तावना :**

राज्यातील शेतकऱ्यांना शेती करताना उद्भवणाऱ्या अडचणींतून येणारे नैराश्य दूर करण्याच्या अनुषंगाने कृषि विभागामार्फत महाडीबीटी पोर्टलद्वारे शेतकऱ्यांना विविध घटकांचा लाभ देण्यात येतो.

शेतकऱ्यांना आवश्यक असणारा घटक/बाब त्याला मागणी केल्यावर तातडीने उपलब्ध करुन दिल्यास त्याचा शेतकऱ्यास मोठया प्रमाणावर फायदा होऊ शकतो. त्यामुळे मा. वित्त मंत्री महोदयांनी सन २०२३-२४ चा अर्थसंकल्प सादर करताना केलेल्या अर्थसंकल्पीय भाषणामध्ये "जून २०१५ मध्ये सुरु केलेल्या मागेल त्याला शेततळे योजनेचा विस्तार करण्यात येत असून, आता मागेल त्याला फळबाग, ठिबक / तुषार सिंचन, शेततळे, शेततळ्याचे अस्तरीकरण, शेडनेट, हरितगृह, आधुनिक पेरणीयंत्रे (BBF) व कॉटन श्रेडर हे घटक उपलब्ध करुन देण्याचे प्रस्तावित आहे. या विविध योजनांकरीता सन २०२३-२४ मध्ये १ हजार कोटी रुपये नियतव्यय प्रस्तावित आहे." अशी घोषणा केली आहे. सदर घोषणेच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :**

१. शेतकऱ्यांना शेतीसाठी आवश्यक असलेले घटक मागणी केल्यावर तातडीने उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मागेल त्याला शेततळे योजनेचा विस्तार करण्यात येऊन मागेल त्याला फळबाग, ठिबक / तुषार सिंचन, शेततळे, शेततळ्याचे अस्तरीकरण, शेडनेट, हरितगृह, आधुनिक पेरणीयंत्रे (BBF) आणि कॉटन श्रेडर देण्यात येईल. शेतकऱ्यांना सदर घटक/बाब कृषि विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या प्रचलित योजनांतर्गत व त्यांच्या अर्थसंकल्पीय तरतूदीतुन उपलब्ध करुन देण्यात येईल. त्याचा तपशील पुढीलप्रमाणे :

| अ.क्र. | घटक / बाब | कृषि विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या प्रचलित योजना |
|---|---|---|
| १ | मागेल त्याला फळबाग | एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान |
| | | भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना |
| २ | मागेल त्याला ठिबक / तुषार सिंचन | राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) |
| ३ | मागेल त्याला शेततळे | मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजना |
| ४ | मागेल त्याला शेततळ्याचे अस्तरीकरण | राष्ट्रीय कृषि विकास योजना |
| | | एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान |
| | | मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजना |
| | | बिरसा मुंडा कृषि क्रांती योजना |
| | | डॉ. बाबासाहेब आंबेडकर कृषि स्वावलंबन योजना |
| ५ | मागेल त्याला शेडनेट / हरितगृह | मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजना |
| | | एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान |
| | | राष्ट्रीय कृषि विकास योजना |
| ६ | मागेल त्याला आधुनिक पेरणीयंत्रे (Broad Bed and Furrow - BBF) आणि कॉटन श्रेडर | कृषि यांत्रिकीकरण उपअभियान |
| | | राज्य पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजना |

२. उपरोक्त घटक हे ज्या कृषि योजनांतर्गत अनुज्ञेय आहेत, त्या योजनांचे विहित निकष व योजनांच्या अंमलबजावणीच्या कार्यपध्दतीचा अवलंब करुन महा-डीबीटी पोर्टलवर अर्ज करणाऱ्या सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील पात्र शेतकऱ्यांना अनुदान वाटप करण्याची कार्यवाही महाडीबीटी पोर्टलद्वारे करावी.

३. उपरोक्त घटकांसाठी अनुज्ञेय असलेले अनुदान संबंधित शेतकऱ्यांच्या आधार क्रमांकाशी संलग्न असलेल्या बँक खात्यावर सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीद्वारे वर्ग करण्यात यावे.

४. या योजनेंतर्गत लाभ देताना अर्जदाराने/शेतकऱ्याने मागणी केलेल्या घटकाचा यापूर्वी शासनाच्या कोणत्याही योजनेंतर्गत लाभ घेतलेला असणार नाही याची खातरजमा करावी.

५. उपरोक्त घटकांच्या वाटपासाठी आवश्यक निधी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता संबंधित प्रचलित योजनेमधून उपलब्ध करुन दिलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून भागवावा व उपरोक्त घटकांच्या मागणीनुसार अतिरिक्त निधीची आवश्यकता असल्यास त्याकरिता मागणी करावी.

६. सदर योजनेची कृषि विभागामार्फत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता अंमलबजावणी करण्यासाठी प्रचार व प्रसिध्दी क्षेत्रीय स्तरावर करावी.

७. आयुक्त (कृषि) यांनी उपरोक्त बाबत क्षेत्रिय स्तरावर मार्गदर्शक सूचना निर्गमित कराव्यात व आयुक्त (कृषि) यांनी याबाबत नियमितपणे आढावा घ्यावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०४२५१९५४०५०००१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

EKNATH RAJARAM DAWALE

Digitally signed by EKNATH RAJARAM DAWALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=499dd4df91587ffef1e20a2ee9e560dd0777e49ff6cfc838f362fdbb58c58e7b, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=17E427867F9F7ACF49F42A7E5B92B77D56EC1F261F185C142A9F28D7626190FB, cn=EKNATH RAJARAM DAWALE
Date: 2023.04.25 20:01:25 +05'30'

**( एकनाथ डवले )**

प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१. मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
५. मा.उप सभापती , महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
६. मा.उप अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
७. सर्व सन्माननीय सदस्य, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

८. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,
९. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई,
१०.मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) विभाग यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
११.मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१२. मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१३.सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव,
१४.मंत्रालयीन विभागाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई,
१५.प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधापरिषद), विधानभवन, मुंबई,
१६.प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा), विधानभवन, मुंबई,
१७.प्रबंधक, उच्च न्यायालय (मुळ न्याय शाखा), मुंबई/औरंगाबाद/नागपूर,
१८. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई/औरंगाबाद/नागपूर,
१९.प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई/औरंगाबाद/नागपूर,
२०.प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई,
२१.महासंचालक, माहिती जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
२२.सर्व विभागीय आयुक्त/सर्व जिल्हाधिकारी,
२३.आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे.
२४.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
२५.सह सचिव/उप सचिव/अवर सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
२६.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
२७.सर्व सह सचिव / उप सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२८. कृषि संचालक (सर्व), कृषि आयुक्तालय, पुणे.
२९.विभागीय कृषि सह संचालक (सर्व).
३०.सर्व अवर सचिव / कार्यासन अधिकारी, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३१.जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व).
३२. संग्रहार्थ निवडनस्ती (१४-अे).